**मुख्यमंत्री माझी शाळा सुंदर शाळा या अभियानाकरिता निधी वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांक:-पूरक-२०२३/प्र.क्र.११२/एसडी-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ११ मार्च, २०२४

**वाचा:-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

२) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.मुमअ २०२३/प्र.क्र.११४/एसडी-६, दि.३०.११.२०२३

३) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पूरक २०२३/प्र.क्र.११२/एसडी-६, दि.१९.०१.२०२४

**प्रस्तावना :-**

या विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील सर्व माध्यमांच्या व सर्व व्यवस्थापनांच्या शाळांमध्ये भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेंतर्गत मुख्यमंत्री माझी शाळा सुंदर शाळा हे स्पर्धात्मक अभियान राबविण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे सदर शासन निर्णयान्वये या अभियानाच्या खर्चापोटी रु.८६.७३ कोटी रुपये इतक्या खर्चास देखील मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर अभियानाची सुरुवात दि.०१.०१.२०२४ रोजी झाली असून दि.१५.०२.२०२४ पर्यंत हे अभियान राबविण्यात आले आहे. तसेच शासकीय शाळा व अन्य शाळा अशा दोन्ही वर्गवारीकरीता प्रत्येक स्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या विजेता शाळा घोषित करण्यात आल्या आहेत. या अभियानासाठी संदर्भ क्र.३ अन्वये रु.९.०० कोटी इतका निधी आतापर्यंत वितरीत करण्यात आला आहे. आता अवितरीत असलेला रु.७७.७३ कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव नियोजन विभागास व वित्त विभागास सादर करण्यात आला असता रु.७७.७३ कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. पुढील तक्त्यात दर्शविण्यात आल्याप्रमाणे भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर आदर्श शाळा योजनेंतर्गत राबविण्यात येत असलेल्या मुख्यमंत्री माझी शाळा सुंदर शाळा या अभियानासाठी रु.७७.७३ कोटी (अक्षरी रुपये सत्त्याहत्तर कोटी त्र्याहत्तर लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**(रक्कम रुपये)**

| लेखाशीर्ष | सन २०२३-२४ पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित निधी | यापूर्वी वितरीत केलेला निधी | वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| मागणी क्रमांक ई-०२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१, प्राथमिक शिक्षण, १०१, शासकीय प्राथमिक शिक्षण (००) (००)(०१) राज्यात आदर्श शाळा विकसित करणे (कार्यक्रम) (२२०२ जे ०७२) ५०-इतर खर्च | ८६,७३,००,००० | ९,००,००,००० | ७७,७३,००,००० |
| **एकूण** | **८६,७३,००,०००** | **९,००,००,०००** | **७७,७३,००,०००** |

३. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तर लेखाधिकारी, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. आयुक्त (शिक्षण) यांनी सदर रक्कम विहित कार्यपद्धतीचा अवलंब करून अभियानांतर्गत घटकांच्या प्राथम्यक्रमानुसार आवश्यक बाबींसाठी खर्च करावी.

५. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा लेखाशीर्षनिहाय/उपलेखाशीर्षनिहाय अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ.माहिती शासनास पाठवावी .

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१२८/१४७१, दि.२९.०२.२०२४ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३३६/व्यय-५, दि.०१.०३.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागांच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१११७२३४३१३२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e89181186 34069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B 9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.03.11 17:33:02 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१.मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२.मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३.मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४.मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

५.मा.सभापती व मा.उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६.मा.अध्यक्ष व मा.उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
७.मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, मुंबई.
८.मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९.मा.मंत्री (सर्व) यांचे यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.विभागीय आयुक्त (सर्व)
१२.आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१३.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण संचालनालय, पुणे.
१४.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१५.जिल्हाधिकारी सर्व.
१६.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व.
१७.शिक्षण संचालक ( प्राथमिक ), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८.शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च-माध्यमिक ), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, पुणे.
१९.संचालक, महाराष्ट्र राज्य, पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती), पुणे.
२०.अध्यक्ष, राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
२१.शिक्षण संचालक (योजना), पुणे.
२२.सहसंचालक, (प्रशासन), शिक्षण आयुक्तालय, पुणे.
२३.विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व).
२४.शिक्षण सहायक संचालक(सर्व).
२५.गटविकास अधिकारी (पंचायत समिती)(सर्व)
२६.मुख्याधिकारी, नगरपालिका, सर्व.
२७.शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/योजना), जिल्हा परिषद (सर्व)
२८.गटशिक्षणाधिकारी (सर्व)
२९.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
३०.विस्तार अधिकारी (शिक्षण)(सर्व)
३१.उपशिक्षणाधिकारी (सर्व)
३२.शिक्षण निरीक्षक (सर्व)
३३.प्राचार्य जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, (सर्व)
३४.प्रशासन अधिकारी, महानगरपालिका(सर्व)
३५.स्थानिक स्वराज्य संस्थेच्या प्राथमिक/उच्च प्राथमिक शाळेचे मुख्याध्यापक(सर्व)
३६.खासगी अनुदानित संस्थेच्या माध्यमिक शाळेचे मुख्याध्यापक (सर्व)
३७.निवड नस्ती (कार्यासन-एसडी-६)